# महाराष्ट्र विधानपरिषद

## चौथे (हिवाळी) अधिवेशन, २०१७

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

### कुडाळीचा पाडा (ता.जव्हार, जि.पालघर) या ओझर ग्रामपंचायत हद्दीतील गावामधील आदिवासी तरुणांना मनरेगांतर्गत कामे देण्याबाबत

**(१) ६९०७ (३१-०७-२०१५). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ओझर ग्रामपंचायत हद्दीतील कुडाळीचा पाडा (ता.जव्हार, जि.पालघर) या आदिवासी वस्तीतील तरुणांनी तहसिलदारांना पत्र पाठवून मनरेगांतर्गत कामे देण्याची विनंती केल्याचे माहे एप्रिल, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या आदिवासी तरुणांना मनरेगांतर्गत कामे देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची करणे काय आहेत ?

**श्री. जयकुमार रावल (२७-०९-२०१७) :** (१) हे खरे आहे.

माहे एप्रिल, २०१५ मध्ये झालेल्या सामाजिक अंकेक्षणाच्या जनसुनवाई मध्ये माहे जानेवारी, २०१४ मध्ये कामाची मागणी केली असल्याचे आरोहन संस्था, मोखाडा यांनी निदर्शनास आणून दिले होते.

(२) सन २०१४ मध्ये ओझर ग्रामपंचायत हद्दीतील कुडाळीचा पाडा (कुंडाचा पाडा) गावातील मजुरांचा काम मागणी अर्ज ग्रामसेवक, ग्रामपंचायत ओझर यांनी तहसील जव्हार कार्यालयात दिनांक १५/०१/२०१४ रोजी सादर केला होता. त्यानुसार तहसीलदार जव्हार यांनी संबंधित यंत्रणांना कामे सुरु करण्यासाठी दिनांक १५/०१/२०१४ रोजी लेखी पत्र देवून कामे सुरु करण्याबाबत सूचना दिलेल्या होत्या. सदर सुचनांप्रमाणे वनपरिक्षेत्र अधिकारी, सावा यांनी सदर मजुरांना दिनांक ३१/०१/२०१४ ते ०६/०२/२०१४ या कालावधीत तुटक समतल चराचे काम उपलब्ध करुन दिले होते व या कामाचे ई-मस्टर जनरेट केलेले होते. परंतु सदर काम वनपट्टेधारक यांच्या क्षेत्रात येत असल्याने व वनपट्टेधारक काम करण्यास मनाई करत असल्याने मजुर कामावर जाऊ शकले नाहीत. ग्रामरोजगार सेवक, वनरक्षक, उपसरपंच तसेच काम मागणी केलेले मजुर यांनी या संदर्भात लेखी पंचनामा सादर केला. त्यानुसार सदर मजुरांना वन विभागाकडून दिनांक २८/०२/२०१४ ते दिनांक ०६/०३/२०१४ व दिनांक ०७/०३/२०१४ ते दिनांक १३/०३/२०१४ च्या कालावधीत ई-मस्टर जनरेट करुन काम पुरविण्यात आले. ई-मस्टरवरील रक्कम रु. १.२६.९९०/- अदा करण्यात आली असून ७८५ मनुष्यदिन निर्मिती झाली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील शाळांमध्ये उर्दुभाषा विषय इयत्ता पाचवी पासुन शिकवण्याच्या शासन निर्णयाबाबत

**(२) ९८२७ (०४-०८-२०१५). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **अल्पसंख्यांक विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सर्व शाळांमध्ये उर्दू भाषा हा विषय एच्छिक विषय इयत्ता ५ वी पासून म्हणून सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षापासून शिकविण्यात

येणार असल्याची घोषणा मा.अल्पसंख्यांक मंत्री महोदयांनी दिनांक ८ मे, २०१५ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, किती शाळांमध्ये उर्दु भाषा हा विषय शिकविला जात आहे व त्यासाठी उर्दु भाषा शिकविणारे किती शिक्षक उपलब्ध आहेत व जादा किती शिक्षकांची आवश्यकता लागणार आहे.

(३) त्याचप्रमाणे उर्दू भाषा शिकवणारे शिक्षक हे पुरेशा प्रमाणात उपलब्ध नसल्यामुळे मा.अल्पसंख्यांक मंत्री यांनी उर्दु विषय शिकविण्याच्या केलेल्या घोषणेची अंमलबजावणी सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षापासून केली जाणार नाही, असे मा.शालेय शिक्षण मंत्री यांनी जाहीर केले असल्याचे दिनांक १४ मे, २०१५ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, याबाबत शासनाचे निश्चित धोरण काय आहे व सद्य:स्थितीत शासनाची निश्चित भुमिका काय आहे ?

**श्री. विनोद तावडे (२९-०९-२०१७) :** (१) होय.

(२) याबाबत धोरणात्मक निर्णय प्रतिक्षाधीन असल्याने शिक्षक संख्या निश्चित करता येत नाही.

(३) याबाबत धोरण निश्चित झालेले नसल्याने सन २०१५-१६ पासून अंमलबजावणी करण्यात आलेली नाही.

(४) मराठी माध्यमातील शाळांमधून उर्दु भाषा विषयाचे अध्यापन करण्याबाबत शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने शासन निर्णय क्रमांक अभ्यास २११६/(प्र.क्र.४३/१६) एस डी ४ दिनांक ४ जुलै, २०१६ निर्गमित केला आहे. सदर शासन निर्णयान्वये राज्यातील १०० मराठी माध्यमांच्या शाळेतील इयत्ता ६ वी ७ वी साठी उर्दु हा विषय संयुक्त स्तरावर प्रायोगिक तत्वावर सुरु करण्यात मान्यता देण्यात आली आहे. या निर्णयामुळे कोणतीही नवीन पदनिर्मिती होणार नाही. तसेच कोणतेही मानधन/ अनुदान शासनामार्फत अदा करण्यात येणार नाही.

---

## राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून निधी प्राप्त होण्याबाबत

**(३) १३३५६ (२२-१२-२०१५). श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून अनेक योजना जाहीर केल्या जातात व कालांतराने राज्याच्या ताब्यात दिल्या जातात. हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत केंद्रीय आरोग्य खात्याने तीन वर्षापासून निधी दिला नसल्याने गरीब रुग्णाच्या मोतीबिंदू शस्त्रक्रिया रखडल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मागील ३ वर्षापासूनचे केंद्राने रुपये ३५ कोटी राज्यास न दिल्याने शस्त्रक्रियेसाठी लागणारे साहित्य ठेकेदाराने देणे बंद केले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२०-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही.

(२) हे खरे नाही.

(३) हे खरे नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात अपारंपरिक ऊर्जा एकत्रित धोरण राबविण्याबाबत

**(४) १६२५९ (२७-०४-२०१६). श्री.प्रकाश गजभिये, श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात एकंदर किती मेगावॅट वीज निर्मिती होते, तसेच राज्याला किती मेगावॅट वीजेची आवश्यकता आहे,

(२) असल्यास, किती मेगावॅट वीज राज्याला २४ तास वीजपुरवठा देण्यासाठी कमी पडत आहे, याकरिता किती नवीन प्रकल्प प्रस्तावित आहे, तसेच सौर प्रकल्प (अपारंपारिक ऊर्जा) किती व औष्णिक ऊर्जा प्रकल्प किती आहेत,
(३) असल्यास, औष्णिक ऊर्जा प्रकल्पास किती निधी उपलब्ध करुन दिला आहे, राज्यात ऊर्जा धोरण २०१५, पर्यंत राबविल्यास विजेच्या क्षेत्रात राज्य सक्षम होईल काय ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (१७-१०-२०१७)** : (१) सद्य:स्थितीत महाराष्ट्र राज्यातील महानिर्मिती कंपनीची एकूण स्थापित वीज निर्मिती क्षमता १३६०२ मे. वॅ. इतकी आहे. महावितरण कंपनीने सन २०१७-१८ करिता ३३,३१४ मे.वॅ. इतक्या वीज पुरवठयाकरिता वीज निर्मिती कंपन्यांसोबत करार केले आहेत. सन २०१६-१७ या वर्षी महावितरणची कमाल मागणी सरासरी १९२०० ते १९८०० मे.वॅ. इतकी होती.
(२) राज्यातील महावितरणच्या वीज ग्राहकांची पुढील चार वर्षातील वीजेची मागणी लक्षात घेऊन वीज निर्मिती प्रकल्पाबरोबर पुरेशा वीज पुरवठयासाठी दिर्घकालीन वीज खरेदी करार केले आहेत. नूतनशील ऊर्जा खरेदी बंधन पूर्ण करण्यासाठी महावितरण कंपनीने शासनाच्या अपारंपारिक ऊर्जा धोरण अंतर्गत ७१०९ मे. वॅ. वीजेसाठी करार केलेले आहेत. तसेच महानिर्मिती कंपनीच्या वीज क्षमतावाढ कार्यक्रमांतर्गत कोराडी, चंद्रपूर व परळी यातील प्रकल्पाद्वारे जानेवारी, २०१७ पर्यंत ३२३० मे.वॅ. ची वाढ झालेली आहे. महानिर्मिती कंपनीचे २२६० मे.वॅ. चे दोन औष्णिक विद्युत प्रकल्प पुढील पाच वर्षात प्रस्तावित असून सौर ऊर्जा प्रकल्पासंदर्भात निविदा प्रक्रिया सुरु आहे.
(३) महानिर्मितीच्या सौर व औष्णिक विद्युत प्रकल्पांसाठी एकूण रु. ६९३.२८ कोटी इतका निधी सन २०१७-१८ साठी मंजूर करण्यात आला आहे.

---

## राष्ट्रीय वीज धोरणांतील सुधारणांना मंजूरी देण्याबाबत

**(५) १६८४२ (२७-०४-२०१६). श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केंद्र शासनाने राष्ट्रीय वीज धोरणांतील सुधारणांना मंजूरी दिलेली असून या धोरणानुसार २०२१-२२ पर्यंत सर्वांसाठी वीज मिळेल या उद्दिष्टाने ॲक्शन प्लॅन देण्याचे आदेश महाराष्ट्र राज्य वीज नियमक आयोगाला या नविन धोरणांतर्गत माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान देण्यात आलेले असून राज्यातील अनेक ठिकाणी ३० वर्षाहून अधिक जुन्या संचाच्या ठिकाणी या निर्णयाचा लाभ होणे अपेक्षित आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबतची वस्तुस्थिती काय आहे वा केंद्र शासनाच्या आदेशानुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (१३-१०-२०१७) :** (१) हे खरे नाही.

केंद्र शासनाने सुधारित राष्ट्रीय वीज धोरण अजून मंजूर केलेले नसून दिनांक २१/०४/२०१६ रोजीचे सुधारित राष्ट्रीय वीज धोरण अद्याप मसूदा स्वरुपात आहे. तथापि, केंद्र शासनाने राष्ट्रीय वीजदर धोरण दिनांक २८/०१/२०१६ रोजी मंजूर केले असून त्यामधील सेक्शन ८ वितरण अंतर्गत २०२१-२२ पर्यंत सर्वांसाठी वीज मिळेल या उदिष्टाने ॲक्शन प्लॅन देण्याचे आदेश राज्य नियामक आयोगास दिले आहेत. यासंदर्भात ३० वर्षाहून अधिक जुन्या संचाकरिता वीजनिर्मिती कंपन्यांकरिता कोणत्याही प्रकारचे निर्देश अद्याप दिले नाहीत.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**नांदेड जिल्हयातील ग्रामीण रुग्णालयातील असुविधेबाबत**

**(६) १९१४४ (०२-०५-२०१६). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) भोकर (जि.नांदेड) तालुक्यातील ग्रामीण रुग्णालयात सुविधा नसल्याने तेथील नागरिकांनी वारंवार तक्रार करुनही प्रशासनाकडून त्यांना मदत होत नसल्याचे माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१०-०८-२०१७) :** (१) व (२) हे अंशत: खरे आहे.
भोकर (जि.नांदेड) तालुक्यातील ग्रामीण रुग्णालयात सुविधा नसल्याची तक्रार माहे जानेवारी, २०१६ मध्ये प्राप्त झाली आहे. प्राप्त तक्रारीची प्रशासनाकडून चौकशी करण्यात आली असून वैद्यकीय अधिक्षक ग्रामीण रुग्णालय, भोकर यांना आवश्यक त्या सूचना देण्यात आल्या आहेत.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात होणाऱ्या अपयशी विद्यार्थ्यांच्या आत्महत्या रोखण्याबाबत**

**(७) १९९८६ (२३-०८-२०१६). श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) दहावी/बारावी आणि अन्य परीक्षेच्या निकालानंतर अपयशी विद्यार्थ्यांनी केलेल्या आत्महत्यांच्या संख्येत यावर्षी वाढ झाली आहे, हे खरे आहे काय,
(२) विद्यार्थ्यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी शासनाने आतापर्यंत काय कार्यवाही केली आहे,
(३) वाशिंग्टन प्लॅन/ यु.एस. सुसाईड प्रिव्हेंशन प्लॅनची अंमलबजावणी महाराष्ट्रात करण्याचे आश्वासन शासनाने विधान परिषदेत दिले होते, त्याबाबत झालेल्या कार्यवाहीचे स्वरुप काय आहे ?

**श्री. विनोद तावडे (२९-०९-२०१७) :** (१) नाही.

(२) शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातील विद्यार्थ्यांमधील ताणतणाव व आत्महत्या यावर उपाययोजना सुचविण्यासाठी टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्स, मुंबई यांच्या स्तरावर अभ्यासगट स्थापन करण्यात आला होता. सदर अभ्यासगटाने सुचविलेल्या उपाययोजना शासनाच्या विचाराधीन आहे.

(३) इयत्ता १० वी मध्ये नापास झालेल्या विद्यार्थ्यांसाठी ५०० माध्यमिक शाळांमध्ये प्रायोगिक तत्वावर कौशल्य सेतू कार्यक्रमाची अंमलबजावणी सुरु आहे. यामध्ये नापास झालेल्या विद्यार्थ्यांना व्यवसाय शिक्षण देण्यासाठी प्रोत्साहित करण्यात येते. तसेच कौशल्य विकासासाठी मार्गदर्शन केले जात आहे. त्याचबरोबर इ. १० वी व इ. १२ वी च्या नियमित परीक्षेत अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी फेर परीक्षेचे आयोजन केले जात आहे.

---

## अकोला येथील डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठाचे विभाजन करुन नवीन विद्यापीठ स्थापन करण्याबाबत

**(८) २००७८ (२०-०४-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक १७०८६ ला दिनांक ४ एप्रिल, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोला येथील डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठाचे विभाजन करुन नवीन विद्यापीठ स्थापन करण्यासाठी शासनाने डॉ.बी. व्यंकटेश्वरलू यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या समितीने केलेल्या पाहणी दौऱ्यातील समितीचा मुल्यांकनाचा अहवाल दिनांक २७ जानेवारी, २०१६ रोजी वा त्यासुमारास शासनास सादर झाला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर अहवालातील शिफारशींचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, शिफारशींच्या अनुषंगाने कृषी विद्यापीठाचे नवीन विद्यापीठ स्थापन करण्याबाबतच्या कार्यवाहीची सद्यःस्थिती काय आहे ?

**श्री. पांडुरंग फुंडकर (०९-१०-२०१७) :** (१) होय.
(२) विविध सुधारणांच्या अधिन राहून विद्यापीठे विभाजनास मान्यता देण्यात आली आहे.
(३) विद्यापीठ विभाजनाच्या अनुषंगाने आवश्यक माहिती मागविण्यात आली असून शासन स्तरावर कार्यवाही सुरु आहे.

---

**सोलापूर शहरात (जि.सोलापूर) यंत्रमाग कामगाराने मोरछाप पिवळा रंग पिऊन आत्महत्या केल्याबाबत**

**(९) २०४१५ (२३-०८-२०१६). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सोलापूर जिल्ह्यात (जि.सोलापूर) एक यंत्रमाग कामगाराने मोरछाप पिवळा रंग पिऊन आत्महत्या केली असल्याची घटना दिनांक २१ मे, २०१६ रोजी वा त्यासुमारास घडली व आतापर्यंत ८ जणांनी पिवळ्या रंगाचे औषध घेऊन आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला असून त्यांपैकी दोन महिलांचा मृत्यू झाल्या असून ६ जण उपचारासाठी सिव्हिलमध्ये दाखल झाले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरील मोर छाप पिवळा रंग हा शहरातील गल्लीबोळातील प्रत्येक दुकानात नाममात्र किंमतीला मिळत असून त्याची विक्री खुलेआम केली जात असूनही याकडे अन्न व औषध प्रशासन दुर्लक्ष करीत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने काय कार्यवाही केली आहे वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीश बापट (०३-१०-२०१७) :** (१) सोलापूर शहरात ३ यंत्रमाग कामगारांनी दारुच्या नशेत मोरछाप पिवळया रंगाचे औषध सेवन केल्याने त्यांचा अकस्मात मृत्यू झाल्याची नोंद एमआयडीसी पोलीस ठाणे, सोलापूर यांच्या अकस्मात मयत नोंदवहीत करण्यात आली आहे.

(२) मोरछाप पिवळया रंगाची उत्पादन, विक्री तसेच साठवणूक याबाबत अन्न व औषध प्रशासन यांचेकडून कोणत्याही प्रकारचा परवाना दिला जात नाही. त्यामुळे मोरछाप पिवळया रंगाच्या विक्रीवर अन्न व औषध प्रशासनाकडून कोणत्याही प्रकारचे नियंत्रण नाही.
(३) संदर्भात जिल्हाधिकारी कार्यालयात दिनांक ०२/०७/२०१६ रोजी आयोजित करण्यात आलेल्या बैठकीत जिल्हाधिकाऱ्यांच्या मौखिक निर्देशानुसार जनतेत मोरछाप पिवळया रंगाच्या वापराबाबत जनजागृती व्हावी यासाठी अन्न व औषध प्रशासनामार्फत अशा प्रकारचे रंग सेवन करणे मानवी आरोग्यास हानीकारक असल्याची शक्यता असते त्यामुळे अशा रंगाचे सेवन करु नये याबाबत स्थानिक वृत्तपत्रात प्रसिध्दी देण्यात आली होती.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मुंबई विद्यापीठाच्या बी.कॉमच्या तृतीय फायनान्सच्या प्रश्नपत्रिकेत चुकीची एण्ट्री दिल्याबाबत**

**(१०) २१०३६ (२३-०८-२०१६). श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई विद्यापीठाच्या परिक्षा विभागाच्या बी.कॉमच्या तृतीय फायनान्सच्या प्रश्नपत्रिकेत चुकीची एण्ट्री देण्यात आल्यामुळे विद्यार्थ्यांमध्ये गोंधळ उडून त्यांच्या आठ गुणांबाबत प्रश्नचिन्ह निर्माण झाल्याचे दिनांक २६ एप्रिल, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मुंबई विद्यापीठाच्या परीक्षा विभागाच्या गोंधळी कारभाराची चौकशी करण्यात आली काय,
(३) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार सदरील प्रकरणातील दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (०३-१०-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.
(२) व (३) (Financial Market, T.Y.B.Com, (Sem VI)(CBSGS) या विषयाची परिक्षा परिक्षाकेंद्रावर सुरु असताना वेळेआधीच प्रश्नपत्रिकेमधील प्रश्न क्र. ५ A बाबतच्या त्रुटीचे निवारण केल्याने व परिक्षा केंद्राना वेळेत कळविण्यात आल्याने विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान झालेले नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**जळगाव जिल्हापरिषदेमार्फत वार्षिक लेखा परीक्षणात दोषी आढळलेल्या ग्रामपंचायती तसेच ग्रामसेवकावर कारवाई करण्याबाबत**

**(११) २३०१७ (२०-०८-२०१६). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) जळगाव जिल्हा परिषदे मार्फत करण्यात येणाऱ्या वार्षिक लेखा परीक्षणात दोषी आढळलेल्या ग्रामपंचायती तसेच ग्रामसेवकावर कारवाई करण्यात विलंब करण्यात आला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन त्याअनुषंगाने सदर ग्रामसेवकावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१८-०९-२०१७) :** (१) व (२) हे खरे नाही.
याबाबत वार्षिक लेखा परिक्षण अहवालानुसार गट विकास अधिकारी यांचेकडून सखोल चौकशी करुन जबाबदार ग्रामसेवक यांचे मासिक वेतनातून वसुलीची कार्यवाही केली जात आहे. सेवा निवृत्त ग्रामसेवक यांचे सेवा निवृत्त वेतनातून रक्कम वसुल केली जात आहे. तसेच मयत ग्रामसेवक यांचे वारसाकडून वसुली केली जात आहे.
(३) प्रश्नच उद्भवत नाही.

---

## लासलगांव-विंचुर (जि.नाशिक) रस्त्यावरील पुलाची झालेली दुरवस्था

**(१२) २५७७१ (३०-१२-२०१६). डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) लासलगांव-विंचुर (जि.नाशिक) रस्त्यावरील पुलाच्या दुरूस्तीकरीता रूपये ५० लाख खर्च करूनही निकृष्ट दर्जाच्या कामामुळे वर्षभरात सदर रस्त्यावरील पुलाची दुरवस्था झाल्याने पुलावरील वाहतूक बंद करण्यात आल्याचे दिनांक १४ ऑक्टोबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सदर पुलाची दुरूस्ती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१८-०७-२०१७) :** (१) नाही.
प्रश्नाधीन रस्त्यावरील प्रकाशा-लासलगाव-विंचुर (रामा-७) सा.क्र. १९८/२०० मधील जुन्या पुलाला समांतर पुलाचे बांधकाम करण्यात आले आहे. पावसाळयात पुलाच्या जोडरस्त्यावर पडलेले खड्डे खडी व डांबराने भरण्यात येऊन सद्य:स्थितीत दोन्ही पुलावरील वाहतूक सुरळीत सुरू आहे.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात अनुदानासाठी पात्र ठरलेल्या परंतु निधी अभावी अनुदान न मिळालेल्या शाळांना शालेय पोषण आहार योजना लागू करण्याबाबत

**(१३) २६०१२ (१६-१२-२०१६). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने दिनांक २४ नोव्हेंबर, २००३ च्या शासन निर्णयानुसार अनुदानासाठी पात्र ठरलेल्या शाळा व तुकड्यांना शालेय पोषण आहार योजना लागू आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यामध्ये अनुदानासाठी पात्र ठरलेल्या परंतु निधी अभावी अनुदान न मिळालेल्या अशा शाळा व तुकड्या किती आहेत,
(३) असल्यास, अशा शाळा व तुकड्यामध्ये वरील शासन निर्णयानुसार शालेय पोषण आहार योजनेस पात्र असूनही शालेय पोषण आहार योजनेपासून वंचित आहेत, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, ज्या शाळांना शालेय पोषण आहारासाठी अनुदान मिळालेले नाही त्या शाळांना अनुदान देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री. विनोद तावडे (२९-०९-२०१७) :** (१) हे खरे आहे.
(२) अनुदानासाठी पात्र ठरलेल्या तथापि, अद्याप अनुदान मंजूर न झालेल्या प्राथमिक व माध्यमिक अशा एकूण ७८९ शाळा व १७३९ तुकडया आहेत.
(३) व (४) अनुदानास पात्र ठरलेल्या तथापि, अद्याप अनुदान मंजूर न झालेल्या मान्यताप्राप्त विनाअनुदानित खाजगी प्राथमिक शाळांना शालेय पोषण आहार योजना लागू करण्याबाबत शासनाच्या दिनांक २४/११/२००३ च्या शासन निर्णयान्वये तरतूद करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी करण्याबाबत शिक्षण संचालक (प्राथ) यांच्या दिनांक १६/०३/२०१७ च्या पत्रान्वये सर्व क्षेत्रिय यंत्रणांना निर्देश देण्यात आले आहेत.

---

**मेक इन इंडिया आणि मेक इन महाराष्ट्र याद्वारे गुंतवणूक केलेल्या कंपन्यांचा तपशिल मिळण्याबाबत**

**(१४) २६७६९ (१२-०४-२०१७). श्री.संजय दत्त, श्री.अमरिशभाई पटेल : तारांकित प्रश्न क्रमांक २०१३६ ला दिनांक २२ जुलै, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मेक इन इंडिया आणि मेक इन महाराष्ट्र यांच्यातील सामंजस्य करारांव्दारे राज्यातील उद्योगांमध्ये कोट्यवधी रुपयांच्या गुंतवणूकीचे धोरण आखले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मेक इन इंडिया आणि मेक इन महाराष्ट्र याद्वारे राज्यात किती कंपन्यांनी कुठे आणि किती गुंतवणूक केली व त्याचा संपूर्ण तपशील काय आहे,
(३) असल्यास, राज्यातील मागास भागात उक्त धोरणाद्वारे किती कंपन्यांनी गुंतवणूक केली आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देसाई (२२-०७-२०१७)** : (१) "मेक इन इंडीया" सप्ताह महाराष्ट्रात दिनांक १३ ते १८ फेब्रुवारी २०१६ दरम्यान मुंबई येथे आयोजित करण्यात आला होता. प्रस्तूत सप्ताहादरम्यान राज्यात विविध क्षेत्रात २६०२ सामंजस्य करार करण्यात आले असून त्याद्वारे सुमारे रू. ८ लाख कोटी आश्वासित गुंतवणूक व ३० लाख रोजगार निर्मिती प्रस्तावित आहे.
(२) व (३) "मेक इन इंडीया व मेक इन महाराष्ट्र द्वारे उद्योग स्थापन करण्यात येत असून सदर प्रकल्पांमध्ये राज्यात अमरावती, औरंगाबाद, कोकण, मुंबई, नागपूर, नांदेड, नाशिक, पुणे या विभागात रू. २८८६९.१२ कोटी गुंतवणूक अपेक्षित आहे.

आतापर्यंत राज्यातील मागास भागात खालीलप्रमाणे कंपन्यांनी गुंतवणूक केली आहे.:- अमरावती - ३१ प्रकल्प - रू. ९९.४६ कोटी
औरंगाबाद - ३२ प्रकल्प - रू. ९२.२६ कोटी
नागपूर - ५९ प्रकल्प - रू. २४३.१५ कोटी
नांदेड - ६३ प्रकल्प - रू. १०४.८१ कोटी

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील सहकारी संस्थांची नोंदणी रद्द करण्याबाबत

**(१५) २६७७१ (१५-०४-२०१७). श्री.सतेज उर्फ बंटी पाटील, प्रा.जोगेन्द्र कवाडे : तारांकित प्रश्न क्रमांक १८३३० ला दिनांक ७ एप्रिल, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अंदाजे ७२ हजार सहकारी संस्थांची नोंदणी शासनाने रद्द करण्याचा निर्णय घेतला असल्याचे दिनांक १८ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नोंदणी केलेल्या सहकारी संस्थापैकी काही संस्थांची केवळ कागदावरच नोंद असल्याचे निदर्शनास आल्याने शासनाने सहकारी कायदा १९६० मधील सुधारणेच्या अनुषंगाने सदर संस्थांची नोंदणी रद्द करण्याचा निर्णय घेतला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देशमुख (१०-१०-२०१७) :** (१) नाही

तथापि, सन २०१५-१६ या वर्षातील सहाकारी संस्थाच्या सर्वेक्षणाअंती बंद, ठाव ठिकाणा नसलेल्या / कार्यस्थगित आढळून आलेल्या एकूण ५४,१२४ संस्था पैकी दिनांक ३१/०३/२०१७ अखेर २६,४१२ संस्थांची नोंदणी रद्द करण्यात आली आहे.
(२) दिनांक ३१/०३/२०१७ अखेर २६,४१२ सहकारी संस्थाची नोंदणी रद्द करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मालवण (जि.सिंधुदुर्ग) येथील मंडईतील व्यापारी गाळयांना वैयक्तिक मीटर देण्याबाबत

**(१६) २६९४५ (१५-०४-२०१७). श्री.नारायण राणे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मालवण (जि.सिंधुदुर्ग) येथील मंडईतील २६ व्यापारी गाळयांना एकाच वीज मीटरवरुन वीज पुरवठा सुरु असून मागील ८ वर्षे वीज वितरण कंपनीकडे वारंवार मागणी करुनही सदर गाळ्यांना वैयक्तिक मीटर देण्यात आलेले नाहीत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर गाळे धारकांना वैयक्तिक वीज मीटर देण्याबाबत वीज वितरण कंपनीने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (२८-०८-२०१७)** : (१) व (२) सध्या मालवण मंडईतील गाळ्यांना एका मीटरवरुन विद्युत पुरवठा चालू असून मालवण नगरपरिषदेस सदर कामाच्या पर्यवेक्षण फी चे कोटेशन देण्यात आलेले असून मालवण नगरपरिषदेकडून सदर कोटेशनचा भरणा केल्यानंतर व नगरपरिषदेने लघुदाब वाहिनीचे काम पूर्ण केल्यानंतर विद्युत पुरवठ्याबाबत पुढील कार्यवाही महावितरण कंपनीमार्फत करण्यात येईल.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सोलापूर जिल्हयातील ग्रामिण भागातील मागासवर्गीय कुटुंबांना आर्थिक मदत करण्यासाठी जिल्हा परिषदेत समाजकल्याण विभागाचा निधी अखर्चित राहिल्याबाबत

**(१७) २७२२८ (१५-०४-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.हेमंत टकले, श्री.अमरसिंह पंडित, अ‍ॅड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक २३९१९ ला दिनांक ५ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सोलापूर जिल्हयातील ग्रामिण भागातील मागासवर्गीय कुटुंबांना आर्थिक मदत करण्यासाठी जिल्हा परिषदेत समाजकल्याण विभाग कार्यरत असून या विभागासाठी जिल्हा परिषदेच्या सेसचा रुपये ६ कोटी ८५ लाख १२ हजार निधी राखून ठेवला आहे. मात्र या विभागातील १५ योजनांवर खर्च करण्यात आला नसल्याचे माहे जानेवारी, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निर्देशनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी करुन संबधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०४-१०-२०१७)** : (१) अंशत: खरे आहे.
माहे फेब्रुवारी ते मार्च, २०१५ मध्ये १३ वैयक्तिक व सामुहिक लाभाच्या योजनांवर एकूण रू. ६,०३,४८,७३२/- खर्च करण्यात आलेला आहे.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**अन्न व औषध प्रशासनाच्या बळकटीकरणासाठी निधी उपलब्ध करण्याबाबत**

**(१८) २७२५२ (१२-०४-२०१७). श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अन्न व औषध प्रशासनाच्या बळकटीकरणासाठी रुपये १३७ कोटी उपलब्ध करण्याचा निर्णय दिनांक ४ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास घेण्यात आला असून यापैकी काही रक्कम केंद्र शासनाकडून उपलब्ध करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त निधीमधून बळकटीकरणाची कोणती कामे करण्यात येणार आहेत, तसेच केंद्र शासनाकडून कोणत्या निकषांनुसार किती निधी उपलब्ध करण्यात येणार आहे व त्याबाबतची सद्य:स्थिती काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीश बापट (११-०९-२०१७) :** (१) राज्यातील औषध नियंत्रण पध्दतीचे बळकटीकरण करण्यासाठी रु. १३६.९६ कोटीचा प्रस्ताव केंद्र शासनाने मान्य केलेला आहे. ज्यामध्ये ४०% हिस्सा हा राज्य शासनाने म्हणजेच रु. ५४.७९ कोटी उपलब्ध करुन द्यावयाचे आहेत. तर उर्वरित ६०% म्हणजेच रु. ८२.१८ कोटी इतका निधी केंद्र शासन राज्यास देणार आहे. मा.राज्य मंत्रिमंडळाच्या दिनांक ०३/०१/२०१७ रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रस्तावाबाबत केंद्र शासनासोबत सामंजस्य करार करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

(२) राज्यातील औषध नियंत्रण पध्दतीचे बळकटीकरण करण्यासाठी सदर योजनेंतर्गत आयुक्त, अन्न व औषध प्रशासन यांनी कामे प्रस्तावित केल्यानुसार खालील कामे करण्यात येणार आहेत

१) अन्न व औषध प्रशासनाच्या पुणे व नाशिक प्रयोगशाळेतील अंतर्गत रचना करणे

२) औषध परवानांच्या Record करिता डाटा एन्ट्री ऑपरेटरची नेमणुक करणे

३) संगणक, प्रिंटर, स्कॅनर, लॅपटॉप च्या खरेदीबाबत व NIC Program च्या Maintenance

४) औषध निरीक्षकांना सहाय्यक म्हणून हंगामी स्वरूपात कंत्राट पध्दतीने

व्यक्तींची नेमणूक करणे

५) मुंबई येथील औषध विभागाच्या विस्तारीकरणाकरिता चौथ्या मजल्याचे बांधकाम करणे व विभागीय कार्यालयांतील अंतर्गत रचना करणे

६) पुणे, नाशिक व नागपूर विभागीय कार्यालयाचे बांधकाम

७) Information, Education & Communication (I.E.C.) करिता

८) भाड्याने वाहने घेण्याबाबत

९) प्रयोगशाळेकरिता मनुष्यबळ उपलब्ध करून देणे

१०) प्रयोगशाळेतील उपकरणे खरेदी व देखभाल करणे

याबाबत केंद्र शासनासोबत सामंजस्य करारही करण्यात आला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे जिल्हा परिषदेच्या समाजकल्याण विभागाने ४०० दिव्यांगाना व बेघरांना घरे देण्याचा घेतलेला निर्णय

**(१९) २७३२१ (१५-०४-२०१७). ॲड.जयदेव गायकवाड, श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे, श्री.नरेंद्र पाटील, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे जिल्हा परिषदेच्या समाजकल्याण विभागाने या वर्षी ४०० दिव्यांगाना घरे देण्याचा निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यानुसार शासनाने आतापर्यंत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत?

**श्रीमती पंकजा मुंडे (०४-१०-२०१७) :** (१) होय.

(२) सदर योजना पुणे जिल्हा परिषदेच्या स्वनिधीतून राबविण्यात येते. पुणे जिल्हा परिषदेमध्ये अपंग यशवंत निवारा योजनेंतर्गत १३ तालुक्यांतील एकूण ४२४ दिव्यांगाना प्रति लाभार्थी रु.१ लक्ष प्रमाणे एकूण ४२४ लक्ष रुपये अनुदान वितरीत करण्यात आले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विंचूर व पाटोदा (जि.नाशिक) येथील उपकेंद्रांच्या प्रस्तावाबाबत**

**(२०) २८२०६ (१५-०४-२०१७). श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक १६४५९ ला दिनांक ४ एप्रिल, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक जिल्ह्यातील ४ ठिकाणी १३२/३३ केव्ही अति उच्चदाब उपकेंद्राची स्थापना करण्याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींनी सन २०१५ मध्ये केलेल्या मागणीनुसार सदर उपकेंद्रे अंतर्भूत करण्यासाठी दिनांक ११ डिसेंबर, २०१५ रोजी वा त्यासुमारास महापारेषणला निर्देश दिलेले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निर्देशानुसार विंचूर उपकेंद्राबाबतचा प्रस्ताव व पाटोदा उपकेंद्राऐवजी ३३ के.व्ही. वाहिन्यांची पुनर्रचना करुन त्याच्या सुसाध्यतेबाबत महापारेषण कंपनीमार्फत पडताळणीचे काम पूर्ण झाले आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (१३-१०-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) विंचूर, ता. निफाड येथे अ.उ.दा. उपकेंद्र जवळ ५ कि.मी. अंतरावर १३२/३३ के.व्ही.लासलगाव अति उच्चदाब उपकेंद्र कार्यरत आहे. सदर उपकेंद्रावर फक्त ३८% भार असल्याने अतिरिक्त भार टाकता येणे शक्य असल्याने विंचूर उपकेद्राचा प्रस्ताव सद्य:स्थितीत सुसाध्य नाही.

महापारेषण व महावितरण कंपनीच्या संयुक्त बैठकीत पाटोदा तालुका येवला येथे अति उच्चदाब उपकेंद्राऐवजी ३३ के.व्ही. वाहिन्यांची पुर्नरचना करण्याची शक्यता पडताळून पहाण्याबाबत महावितरण कंपनीस निर्देश देण्यात आले होते. १३२/३३ के.व्ही. येवला उपकेंद्र येथून नविन ३३ के.व्ही बे काढण्याकरिता जागा उपलब्ध नसल्याने, ३३ के.व्ही.वाहिन्यांची पुर्नरचना करणे तांत्रिकदृष्टया शक्य नसून त्याऐवजी १३२/३३ के.व्ही.पाटोदा उपकेंद्राची

उभारणी करणे योग्य होईल असे महावितरण कंपनीने कळविले असून त्या अनुषंगाने पुढील कार्यवाही करण्याबाबत महापारेषण कंपनीस सूचना देण्यात आल्या आहेत.
(३) व (४) प्रश्न उदभवत नाही.

---

**नागपूर प्रादेशिक परिवहन, नागपूर ग्रामीण विभागातील फेर तपासणी न केलेल्या शालेय बसेचा परवाना रद्द करण्याबाबत**

**(२१) २८८०५ (१३-०४-२०१७). श्री.मितेश भांगडिया, प्रा.अनिल सोले : तारांकित प्रश्न क्रमांक २५४८४ ला दिनांक ८ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर प्रादेशिक परिवहन, नागपूर ग्रामीण विभागाने ६०९ स्कूल बसचा परवाना रद्द करण्याचा निर्णय घेतल्यानंतर ३२० बस चालकांनी आपल्या बसेसची फेर तपासणी केली असल्याचे दिनांक २० डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, परवाना रद्द करण्याचा निर्णय घेतलेल्या ६०९ बसेसपैकी २८९ बसेसनी अद्यापही आपल्या बसची फेर तपासणी केलेली नसून देखील या बसेसमार्फत शालेय विद्यार्थ्यांची ने-आण सुरुच आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून फेर तपासणी न केलेल्या २८९ बसेसचा परवाना रद्द करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (२६-१०-२०१७) :** (१) हे खरे आहे. प्रादेशिक परिवहन कार्यालय, नागपूर (ग्रामिण) यांच्या अभिलेखावरील फेर तपासणीसाठी न सादर केलेल्या ६३६ स्कूल बसेसचे परवाने माहे सप्टेंबर, २०१६ मध्ये निलंबित करण्यात आले होते. त्यानंतर यापैकी ३४१ बस मालकांनी त्यांची वाहने डिसेंबर, २०१६ पर्यंत फेरतपासणीसाठी सादर केली आहे.

(२) परिवहन कार्यालयाच्या वायुवेग पथकातर्फे करण्यात येणाऱ्या वाहन तपासणी दरम्यान परवाना निलंबित केलेल्या २९५ बसेस विद्यार्थ्यांची ने-आण करतांना आढळून आल्या नाहीत. तसेच उपरोक्त बसेस सार्वजनिक रस्त्यावर आढळून आल्यास त्या अटकावून ठेवण्याबाबतचे आदेश वायुवेग पथकास देण्यात आले आहेत.

(३) सदर २९५ बसेसचे परवाने निलंबित करण्यात आलेले आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी लेखनिक व वाचक बँक सुरु करण्याबाबत**

**(२२) २९६४० (१५-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी लेखनिक व वाचक बँक सुरु करण्याचा निर्णय शासनाने माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या निर्णयाची अंमलबजावणी कशा प्रकारे व केव्हापासून करण्यात येणार आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (०३-१०-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) उच्च शिक्षण घेणाऱ्या दिव्यांग विद्यार्थ्यांना परिक्षेमध्ये सोयी-सवलती देण्याबाबत शासनाने दिनांक ४ मार्च, २०१७ रोजी शासन निर्णय निर्गमित केला आहे. त्यामध्ये राज्यातील दिव्यांग विद्यार्थ्यांना परिक्षेसाठी महविद्यालयाचे प्राचार्य/ संचालक यांच्या पूर्वपरवानगीने लेखनिक घेता येणार आहे. मात्र लेखनिकाची व्यवस्था पालकांनी महाविद्यालयाच्या सहकार्याने करावयाची आहे. अन्यथा शक्य असल्यास महाविद्यालयाने लेखनिकांची यादी ठेऊन त्या यादीतून लेखनिक द्यावा अशी तरतूद आहे. मात्र वाचक बँक सुरु करण्याबाबतचा निर्णय अद्याप घेण्यात आलेला नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सहजिल्हा निबंधक वर्ग १ ठाणे यांच्या कार्यक्षेत्रांतील मुंद्राक परताव्या विलंबाबाबत

**(२३) ३००९३ (१५-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सहजिल्हा निबंधक वर्ग १ ठाणे (ग्रामीण) यांच्या कार्यक्षेत्रातुन सन २०१३ ते २०१६ या वर्षात मुद्रांक भरणाऱ्यांना परतावा मिळाला नसल्याचे दिनांक १० फेब्रुवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (२३-१०-२०१७) :** (१) अशी बाब निदर्शनास आली नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अहमदनगर जिल्हा परिषदेत निधी उपलब्ध असतानाही योजना वेळेत पूर्ण झाल्या नसल्याबाबत

**(२४) ३०३५१ (१५-०४-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अहमदनगर जिल्हा परिषदेत निधी उपलब्ध असतानाही योजना वेळेत पूर्ण करण्यात एकही विभाग यशस्वी ठरला नसल्याचे माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, काही विभागांचा मागील वर्षातीलही निधी खर्च झालेला नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय व त्यानुसार निधी अखर्चित ठेवणाऱ्या अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२५-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही.

वित्त विभाग शासन निर्णय दिनांक ६ जून, २००८ मधील तरतूदीअन्वये सन २०१६-१७ चा निधी पुढील आर्थिक वर्षात खर्च करण्यास परवानगी आहे. त्यानुसार सर्व योजनांचा निधी सन २०१७-१८ मध्ये खर्च करण्यात येत आहे.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**नाशिक तालुका व जिल्हा हद्दीतील गांवातील शेत जमिनींवर असलेल्या देवस्थान संस्थांनाच्या नोंदी कमी करणेबाबत**

**(२५) ३१०६७ (०७-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : दिनांक ३० मार्च, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ४ मधील प्रश्न क्रमांक २३७८९ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील देवस्थान जमिनीच्यासंदर्भात तत्कालिन राज्यमंत्री (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीचा अहवाल शासनास सादर करण्यात आलेला असून उक्त विचाराधीन अहवालावरील शासनाचा विचार पुर्ण झाला आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील देवस्थान जमिनीसंदर्भात शासनाची भुमिका ठरविण्याकरिता याबाबत सर्वकष अभ्यास करून शासनास योग्य शिफारशी करण्याकरिता शासन निर्णय क्रमांक : जमीन-२०१६ /प्र.क्र.१००/ज-१, दिनांक २३/३/२०१६ अन्वये प्रधान सचिव (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदरहू समितीचा अहवाल शासनास प्राप्त झाला आहे काय व त्यानुषंगाने शासनाने चौकशी करून नाशिक तालुका व जिल्हा हद्दीतील गावांतील शेत जमिनींवर असलेल्या देवस्थान संस्थांच्या नोंदी कमी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहे ?

**श्री. चंद्रकांत पाटील (२३-१०-२०१७) :** (१), (२) व (३) राज्यातील देवस्थान जमिनीच्या संदर्भात तत्कालिन राज्यमंत्री (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीचा अहवाल शासनास प्राप्त झाला असून, सदर अहवाल शासनास सादर करण्यात आला होता.

सदर अहवालातील शिफारशींच्या अनुषंगाने राज्यातील देवस्थान जमिनीसंदर्भात शासनाची भूमिका ठरविण्याकामी शासनास शिफारशी करण्याकरीता या विभागाच्या शासन निर्णय क्र. जमीन-२०१६/प्र.क्र.१००/ज-१, दिनांक २३/०३/२०१६ अन्वये

प्रधान सचिव (महसूल) यांचे अध्यक्षतेखाली अभ्यास समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीकडून या विषयाबाबतचा सर्वंकष अभ्यास सुरू असून, त्याबाबतचा समितीचा अहवाल लवकरच अपेक्षित आहे.

(४) प्रश्न उदभवत नाही.

---

**गाई-गुरांच्या पोटात प्लास्टिक आढळून आल्याबाबत**

**(२६) ३१२१५ (०७-०८-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.जयवंतराव जाधव :** सन्माननीय **पशुसंवर्धन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गाई गुरांच्या पोटाची शस्त्रक्रिया केल्यानंतर प्रत्येकाच्या पोटात ३० ते ४० किलो प्लास्टिक आढळून आल्याचे दिनांक १४ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. महादेव जानकर (०४-१०-२०१७) :** (१) हे अंशत: खरे असून सटाणा, जि.नाशिक येथे दिनांक १३.०६.२०१७ रोजी मोकाट गो-ह्याची शस्त्रक्रिया केली असता, पोटातून साधारणत: २२ किलो अपचनिय वस्तु बाहेर काढण्यात आल्या आहेत.

(२) जनावरांमध्ये विविध प्रकारच्या क्षार कमतरतेमुळे अखाद्य वस्तु खाण्याचे प्रमाण मोठ्या प्रमाणात दिसून येते. जनावरांमध्ये क्षारांची कमतरता निर्माण होवू नये. याकरिता पशुपालकांना विविध योजनांमधून मार्गदर्शन करण्यात येवून जनावरांच्या दैनंदिन आहारामध्ये क्षार मिश्रणाचा वापर करण्यासंदर्भात प्रबोधन करण्यात येत आहे. तसेच, विविध योजनांमधून जनावरांसाठी क्षार मिश्रणांचा पुरवठा देखील करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## केंद्र शासनाच्या कंज्युमर क्लब योजनेंतर्गत विद्यार्थ्यांचे ग्राहक प्रबोधन करण्याबाबत

**(२७) ३१२४६ (११-०८-२०१७). श्री.जगन्नाथ शिंदे, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) केंद्र शासनाच्या कंज्युमर क्लब योजनेंतर्गत विद्यार्थ्यांचे ग्राहक प्रबोधन करण्याकरीता सन २०१०-११ या वर्षाकरिता राज्यात ५०० कंज्युमर क्लब स्थापन करण्यासाठी राज्यातील २२ संस्थांचे प्रस्ताव केंद्र शासनाने मंजूर केले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर योजनेसाठी रुपये ५० लक्ष इतके अनुदानही मंजूर केले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त कंज्युमर क्लबची सर्वसाधारण कार्यपद्धती काय तसेच सदरहू क्लब राज्यातील कोणकोणत्या भागात कार्यरत आहेत,
(४) नसल्यास, कंज्युमर क्लब योजनेसाठी करण्यात आलेल्या अनुदानाचा विनियोग कशाप्रकारे करण्यात आला वा येत आहे ?

**श्री. गिरीश बापट (२५-०९-२०१७) :** (१) होय, केंद्र शासनाच्या कंज्युमर क्लब योजनेंतर्गत विद्यार्थ्यांचे ग्राहक प्रबोधन करण्याकरीता सन २०१०-११ या वर्षाकरीता राज्यात ५०० कंज्युमर क्लब स्थापन करण्यासाठी राज्यातील २५ संस्थांचे प्रस्ताव केंद्र शासनाने मंजूर केले होते.
(२) होय हे खरे आहे.

(३) कंझ्युमर क्लब योजनेंतर्गत शाळांमध्ये कंझ्युमर क्लब स्थापन करुन विद्यार्थ्यांमध्ये ग्राहक जागृती निर्माण करणे, ग्राहक संरक्षण कायद्याबाबत माहिती देणे, ग्राहकांचे हक्क व कर्तव्ये याबाबत प्रदर्शन भरविणे. दिनांक १५ मार्च हा जागतिक ग्राहक दिन व दिनांक २४ डिसेंबर हा दिवस राष्ट्रीय ग्राहक दिन म्हणून साजरा करणे तसेच, ग्राहक चळचळ मजबूत करणे हा मुख्य उद्देश असून, सदरहू कंझ्युमर क्लब बीड, अकोला, वाशिम, चंद्रपूर, जालना, वर्धा, नांदेड, परभणी, सांगली, औरंगाबाद, गडचिरोली, बुलढाणा, नाशिक, हिंगोली इत्यादी १४ जिल्हयात स्थापन करण्यात आले आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ नागपूर अंतर्गत विधी विद्यापीठाच्या वसतिगृहात गैरप्रकार झाल्याबाबत

**(२८) ३१५४२ (११-०८-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.मितेश भांगडिया, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ नागपूर अंतर्गत विधी विद्यापीठाच्या वसतिगृहात प्रवेश पात्र विद्यार्थ्यांव्यतिरिक्त बाहेरील विद्यार्थी राहत असल्याचे दिनांक ९ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करणयात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (०३-१०-२०१७) :** (१) हे खरे नाही.

विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांव्यतिरिक्त बाहेरील विद्यार्थी वसतिगृहात राहात असल्याचे निदर्शनास आलेले नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## यवतमाळ येथील शासकिय रुग्णालयातील वैद्यकिय अधिकारी नियमित उपस्थित राहून रुग्णांना पुरेशी आरोग्य सेवा देण्याबाबत

**(२९) ३२१२४ (१८-०८-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ येथील शासकीय रुग्णालयात डॉक्टर वेळेवर येत नसल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) तसेच दिनांक ३० एप्रिल, २०१७ रोजी प्रसूती विभागातील वैद्यकिय अधिकाऱ्यांनी सदर विभागास भेट दिली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नूसार सदर रुग्णालयातील वैद्यकिय अधिकारी नियमित उपस्थित राहून रुग्णांना पुरेशी आरोग्य सेवा द्यावी म्हणून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (२६-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही

(२) हे खरे नाही

(३) प्रश्न उद्‌भवत नाही

(४) लागू नाही

---

## चकबाम्हणी (ता. सिंदेवाही, जि.चंद्रपूर) येथे वाघाच्या हल्यात मृत्यूमुखी पडलेल्या महिलेच्या कुटुंबियांना आर्थिक मदत मिळण्याबाबत

**(३०) ३२३९१ (१८-०८-२०१७). श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चकबाम्हणी (ता.सिंदेवाही, जि.चंद्रपूर) येथील मिराबाई चौधरी या महिलेवर वाघाने हल्ला करून ठार केल्याचे दिनांक ९ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मृत कुटुंबांच्या वारसांना आर्थिक मदत करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुधीर मुनगंटीवार (२६-०९-२०१७) :** (१) हे खरे आहे.

ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्पातील बफर विभागात माहे ८ जानेवारी, २०१७ रोजी दुपारी ३.३० वाजताचे सुमारास श्रीमती मिराबाई नारायण चौधरी, वय ६० वर्ष रा. चकबामणी ता.सिंदेवाही, जि.चंद्रपूर ह्या महिलेस स्वत:च्या शेता मध्ये तुरी कापत असताना वाघाने हल्ला करुन ठार केले.

(२) सदर प्रकरणाची चौकशी करून शासन निर्णयातील तरतुदीनुसार मृतकाच्या वारसदार मुलगा श्री. माधव नारायण चौधरी यांना प्रकल्पातील बफर विभागाचे आदेश क्र. कक्ष-९/दक्षता-३/२८२४ दिनांक १८/०२/२०१७ अन्वये रु. ८ लक्ष आर्थिक मदत धनादेश क्रमांक ९२४१७३ दिनांक २७/०२/२०१७ अन्वये वाटप करण्यात आलेले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापिठातील मालमत्तेचे नुकसान झाल्याबाबत**

**(३१) ३२४०५ (११-०८-२०१७). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापिठातील संरक्षक भिंतीला खड्डा पाडून त्याठिकाणी मद्यपींची वावर होऊन विद्यापिठाच्या मालमत्तेचे नुकसान होत असून विद्यापिठ प्रशासनाने याबाबत कोणतीच कार्यवाही केली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२६-०९-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठातील संरक्षक भिंतीला भगदाड पडल्याचे निदर्शनास आल्यानंतर त्वरित तेथे अधिकचे सुरक्षारक्षक तैनात करण्यात आले आहेत. त्यामुळे तेथे मद्यपींचा वावर नाही.

(२) विद्यापीठ परिसरात झालेल्या महाराष्ट्र राज्य पोलिसांच्या आंतरराज्यीय क्रीडा स्पर्धानंतर, विद्यापीठाच्या क्रीडा विभागाच्या मागच्या बाजुला असलेली संरक्षक भिंत अज्ञान इसमांनी तोडली असल्याचे विद्यापीठाने पोलिस निरिक्षक, बेगमपुरा पोलिस ठाणे, औरंगाबाद यांना माहिती व पुढील कार्यवाहीसाठी कळविले आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गुंज (ता.वाडा, जि.पालघर) येथील श्री परशुरामाचे मंदिराची दुरुस्ती करण्याबाबत

**(३२) ३२५७९ (११-०८-२०१७). श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गुंज (ता.वाडा, जि.पालघर) येथील ६०० ते ७०० वर्ष जुन्या श्री परशुरामाच्या ऐतिहासिक व पौराणिक मंदिराची पडझड झाली असल्याने मंदिर पडण्याची भिती निर्माण झाल्याचे दिनांक २४ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पुरातत्व खात्याने या मंदिराची डागडुजी करुन हा प्राचीन ठेवा जतन करावा अशी मागणी ग्रामस्थांनी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२९-०९-२०१७) :** (१) होय, तथापि गुंज ता.वाडा, जि.पालघर) येथील परशुराम मंदिर राज्य सरंक्षित स्मारक नाही. तसेच सदर मंदीर राज्य संरक्षित स्मारक म्हणून घोषित करण्याच्या योग्यतेचे नाही असे पुरातत्व संचालनालयाचे अभिप्राय आहेत.

(२) नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**कळमनुरी (जि.हिंगोली) शहरातील साईनगर ग्रीनपार्क भागातील पाणीपुरवठा योजनेच्या अर्धवट कामाबाबत**

**(३३) ३२६९६ (११-०८-२०१७). श्री.रामराव वडकुते : तारांकित प्रश्न क्रमांक १७१८२ ला दिनांक २९ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कळमनुरी (जि.हिंगोली) शहरातील साईनगर ग्रीनपार्क भागातील पाणीपुरवठा योजनेचे काम दोन वर्षानंतरही अर्धवट अवस्थेत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या भागातील पाणीपुरवठा योजनेचे काम अर्धवट असण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पाणीपुरवठा पूर्ण करण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. बबनराव लोणीकर (२५-१०-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

सद्य:स्थितीत योजनेची उद्‌भव विहीर, पंपिंग मशिनरी, उध्दरण वाहिणी, वितरण व्यवस्था इ.कामे पुर्ण झाली असून स्विचरुमचे प्लॅस्टरचे काम व कलरींग तसेच जलकुंभाचे कलरींग इत्यादी किरकोळ कामे
(२) या भागातील पाणीपुरवठा योजनेचे काम अर्धवट असण्याची कारणे पुढीलप्रमाणे आहेत.

१) उद्‌भव वाहिणीचे काम शहराजवळील साई नगर येथील भूखंड धारकाने रोखले होते. त्यामुळे सहा महिने काम थांबलेले होते.

२) योजनेची उद्भव विहीर कळमकोंडा पाझर तलावाच्या बुडीत क्षेत्रात असल्याने व तलावात पाणी साचल्याने तलावातील पाणी कमी होईपर्यंत कामे करता आली नाहीत.

३) ग्राम पाणीपुरवठा व स्वच्छता समितीमध्ये अंतर्गत वाद होता, त्यामुळे काम चालु ठेवण्यास अडचणी निर्माण होऊन काम अर्धवट राहीले होते.

(३) मुख्यत: सदरील काम अर्धवट राहण्याकरीता ग्राम पाणीपुरवठा व स्वच्छता समिती मधील अंतर्गत वाद कारणीभुत असल्याने दिनांक ३०/०६/२०१६ रोजी ग्रामसभा घेवुन ग्राम पाणीपुरवठा व स्वच्छता समिती नव्याने पुनर्गठीत करण्यात आली व समितीत पुढील अग्रिम वितरीत करुन त्यामधुन साई नगर व अंतर्गत ग्रिनपार्क येथील वितरण व्यवस्था पुर्ण करण्यात आली.

सदर योजना माहे सप्टेंबर, २०१७ अखेर पूर्ण करणार असून सदरील काम हे ग्राम पाणीपुरवठा व स्वच्छता समिती, संबंधित ठेकेदाराकडून पूर्ण करणार आहे.

योजनेस विलंब होण्यास कारणीभुत असलेल्या ग्राम पाणीपुरवठा व स्वच्छता समितीच्या सचिवाची विभागीय चौकशी चालु आहे.

साई नगर भागातील ग्रामस्थांना पाणी टंचाई भासु नये म्हणून योजनेतून जलकुंभाशिवाय थेट वितरण व्यवस्थेद्वारे पाणीपुरवठा चालु करण्यात आला आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## लोणार सरोवर (जि.बुलढाणा) परिसरातील आटलेले झरे पुनर्जीवित करण्याबाबत

**(३४) ३२८४४ (११-०८-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) लोणार सरोवर (जि.बुलढाणा) परिसरातील ५ पैकी २ झरे आटले असल्याचे माहे मार्च, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले असून यासंदर्भात जिल्हाधिकारी यांनी सर्वेक्षण विभागाकडून याचा अभ्यास करण्याची सूचना केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर आटलेले झरे पुन्हा पुनर्जीवित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. बबनराव लोणीकर (१६-१०-२०१७) :** (१) हे खरे आहे.
(२) सदर प्रकरणी सहाय्यक वन संरक्षक, मेहकर यांनी लोणार अभयारण्य परिसराची पाहणी करुन एकूण पाच झऱ्यांची यादी सादर केली आहे. त्यापैकी दोन झरे आटलेले असून या आटलेल्या झऱ्यांचे पुनिर्जिवीकरण करणेकरीता सर्वेक्षणाचे काम करण्याबाबत भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा बुलडाणा यांना दिनांक १६/९/२०१७ अन्वये जिल्हाधिकारी, बुलडाणा यांचे माहितीनुसार निर्देशित करण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात विद्यार्थीनींची पटसंख्या वाढविण्यासाठी उपस्थिती भत्त्यात वाढ करण्याबाबत

**(३५) ३२८९३ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २७१७५ ला दिनांक १ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात विद्यार्थीनींची पटसंख्या वाढविणे व टिकविणे यासाठी सध्याच्या महागाईनुसार उपस्थिती भत्त्याच्या रक्कमेत वाढ करण्यासंबंधीच्या विचाराधीन प्रस्तावावर शासनाचा विचार पुर्ण झाला आहे काय,
(२) असल्यास, त्याबाबत शासनाने कोणता निर्णय घेतला आहे, त्या निर्णयाचे थोडक्यात स्वरुप काय आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन वाढीव उपस्थिती भत्ता प्रदान करण्यासंबंधी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, उक्त विचाराधीन बाबीवरील निर्णय केव्हापर्यंत होणे अपेक्षित आहे ?

**श्री. विनोद तावडे (२८-०९-२०१७) :** (१) व (२) नाही.
(३) व (४) उपस्थिती भत्त्यामध्ये वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन असून, त्यास काही कालावधी लागण्याची शक्यता आहे.

---

**शिवाजी नाटयगृह, दादर (मुंबई) येथील प्रतिक्षागृह अद्ययावत करण्याबाबत**

**(३६) ३२९३३ (११-०८-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शिवाजी नाटयगृह, दादर (मुंबई) येथील नाटयगृहातील प्रतिक्षागृह अद्ययावत करण्याची मागणी नाटय रसिकांनी संबंधित विभागाकडे केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन उक्त नाटयगृहातील प्रतिक्षागृह अद्ययावत करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२९-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**सातवीच्या बदललेल्या अभ्यासक्रमातील सामान्य विज्ञानाच्या पुस्तकात चुका आढळल्याबाबत**

**(३७) ३२९४७ (११-०८-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) यंदा बालभारतीने सातवीच्या बदललेल्या अभ्यासक्रमातील सामान्य विज्ञानाच्या पुस्तकात चुकाच चुका असल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन जबाबदार असणाऱ्या संबंधितांवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२८-०९-२०१७)** : (१) नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात सामुहिक प्रोत्साहन योजनांचे मुद्रांक शुल्क माफ केल्याबाबत**

**(३८) ३२९५५ (१९-०८-२०१७). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील जमीन खरेदी, जमिनीचा भाडेपट्टा, प्रकल्प उभारणीसाठी भाग भांडवल व प्रकल्पाचा विस्तार करण्यासाठी शासनाचे मुद्रांक शुल्क माफ करण्याचे सन १९९३ चे धोरण लागू असताना सामुहिक प्रोत्साहन योजनांना सन २०१३ मध्ये शासनाने नविन उद्योग उभारणीसाठीचे मुद्रांक शुल्क माफ केले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शासनाच्या उद्योग व महसूल विभागांनी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामध्ये विसंगती निर्माण झाली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उद्योग संचालनालय, मुंबई यांनी दिलेल्या अभिप्रायानुसार महसूल विभागाने मागील अडीच वर्षात मुद्रांक शुल्कामध्ये कोणतीही सुधारणा व दुरूस्ती न केल्याने पात्र उद्योजकास शासनाच्या उद्योग धोरणानुसार लाभ झालेला नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देसाई (११-१०-२०१७)** : (१) सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१३ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ४.७ अन्वये उद्योगांना विविध प्रयोजनासाठी मुद्रांक शुल्क माफीची सवलत देय केली आहे.
(२) अशंत: खरे आहे.

(३) राज्यात माहे मार्च, २०१७ पर्यंत एकूण ५९०७ उद्योगांना मुद्रांक शुल्क सवलत प्रमाणपत्र निर्गमित करण्यात आली आहेत. तथापि, काही उद्योगांना विविध प्रयोजनार्थ प्रथम संलेखाकरीता मुद्रांक शुल्क माफीची सवलत गुंतवणुक कालावधीकरीता उपभोगता येत नसल्याची बाब महसूल विभागाच्या निदर्शनास आणून त्यात सुधारणा करण्याचा प्रस्ताव महसूल विभागाकडे विचाराधीन आहे.
(४) महसूल विभागामार्फत कार्यवाही करण्यात येत आहे.

---

**अहमदनगर जिल्ह्यातील शेतकऱ्यांना शेत तळ्याचे अनुदान देण्याबाबत**

**(३९) ३३०२८ (०७-०८-२०१७). डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अहमदनगर जिल्ह्यात कृषी विभागाची पूर्व परवानगी न घेता शेतकऱ्यांनी शेतात तळी तयार केली आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या तळयांना अनुदान देण्याबाबत मा.पालकमंत्री यांच्याकडे मागणी केली असता अद्याप त्यावर कार्यवाही झाली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने निर्णय घेवून सदर शेतकऱ्यांना अनुदान देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. पांडुरंग फुंडकर (०५-१०-२०१७) :** (१) होय.
(२) व (३) राष्ट्रीय फलोत्पादन अभियानांतर्गत पूर्वसंमती न घेता, तयार करण्यात आलेल्या वैयक्तिक/सामुहिक शेततळयांना अनुदान देय ठरत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**बीड जिल्हा परिषद शाळेतील संगणक संच दुरुस्त करण्याबाबत**

**(४०) ३३२५२ (११-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बीड जिल्हा परिषद शाळांना सर्वशिक्षा अभियानांतर्गत वितरीत केलेले संगणक संच दुरुस्तीअभावी विनावापर अवस्थेत असून उक्त शाळांना किती संगणक संच देण्यात आले आहेत,

(२) असल्यास, किती संगणक संच सुरु व किती बंद अवस्थेत आहेत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन बीड जिल्हा परिषद शाळेतील संगणक संच दुरुस्त करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२९-०९-२०१७) :** (१) जिल्हा परिषदेच्या १५० शाळांना ६५७ संगणक संच देण्यात आले आहेत.

(२) ६५७ संगणक संचापैकी ६३१ संगणक संच वापरात आहेत व २६ संगणक संच वापरात नाहीत.

(३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०११ नुसार कार्यवाही करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यात अभियांत्रिकी महाविद्‌यालये बंद पडल्याबाबत**

**(४१) ३३२६५ (०७-०८-२०१७). श्री.तानाजी सावंत, श्री.नागोराव गाणार, श्रीमती स्मिता वाघ : तारांकित प्रश्न क्रमांक २७१०७ ला दिनांक २० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील नागपूर, औरंगाबाद, जळगांव, कोल्हापूर तसेच अन्य जिल्हयामधील सुमारे २३ अभियांत्रिकी महाविद्‌यालये मागील सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षात विद्‌यार्थी संख्येअभावी बंद करण्यात आल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शैक्षणिक वर्ष २०१७-१८ मध्ये विद्यार्थ्यांच्या संख्येत वाढ होऊ शकते त्यामुळे भविष्यात अभियांत्रिकी शाखेत प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांना तसेच तेथील तत्पूर्वीच्या शैक्षणिक वर्षातील विद्यार्थ्यांना महाविद्यालये उपलब्ध होऊ शकणार नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अभियांत्रिकीची आणखी महाविद्यालये बंद पडू नयेत याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२५-०९-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ओवापेठ, रांजणपाडा येथून खारघरकडे (नवी मुंबई) जाणाऱ्या मुख्य रस्त्यावर बेकायदा वाळू विक्री केली जात असल्याबाबत

**(४२) ३३८१२ (०७-०८-२०१७). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ओवापेठ, रांजणपाडा येथून खारघरकडे (नवी मुंबई) जाणाऱ्या मुख्य रस्त्यावर बेकायदा वाळू विक्री केली जात असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी पनवेल महसूल कार्यालयाने माहे जून, २०१६ मध्ये केलेल्या कारवाईत बेकायदा ३४ वाळूचे ट्रक व एक जेसीबी जप्त केला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबनाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (३०-१०-२०१७) :** (१), (२) व (३) रायगड जिल्ह्यातील ओवापेठ, रांजणपाडा येथून खारघरकडे (नवी मुंबई) जाणाऱ्या मुख्य रस्त्यावर बेकायदा वाळू विक्री केली जात असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आलेले नाही.

तथापि, रायगड जिल्ह्यातील पनवेल तालुक्यातील मौजे तळोजा येथे दिनांक १६ जून,२०१७ रोजी पहाटे पाच वाजताच्या सुमारास पोलीस उपायुक्त, वाहतूक शाखा, नवी मुंबई व तहसिलदार, पनवेल यांनी वाळूची अवैध वाहतूक करणाऱ्या ३२ ट्रकवर संयुक्तपणे कारवाई करुन सुमारे रुपये ४,०६,०००/- किंमतीची ११६ ब्रास वाळू जप्त केली आहे.

सदर प्रकरणी संबंधितांवर खारघर पोलीस ठाण्यामध्ये गुन्हा दाखल करण्यात आला आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**वाळूज (जि.औरंगाबाद) येथील वक्फ मालमत्ता ताब्यात घेण्याबाबत**

**(४३) ३३८७४ (११-०८-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी : तारांकित प्रश्न क्रमांक २७७१५ ला दिनांक १ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **अल्पसंख्यांक विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाळूंज (ता.गंगापूर, जि.औरंगाबाद) येथील सर्व्हे नं. २११ मधील ३१ एकर ३५ गुंठे एवढी जागा लीज करार करुन देतांना वक्फ अधिनियम, १९५४ च्या कलम ३६ चे उल्लंघन झालेले असल्याने ती मालमत्ता वक्फ अधिनियम, १९९५ मधील तरतुदीनुसार वक्फ मंडळाकडे पुर्ववत घेण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी असे निर्देश न्या. ए.टी.ए.के. शेख यांनी अल्पसंख्याक विभाग यांना दिले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त नियमांचे उल्लंघन करुन देण्यात आलेल्या जमिनीचा व्यवहार रद्द करून जागा वक्फ मंडळाच्या ताब्यात देण्याबाबत अल्पसंख्याक विभागाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२८-०९-२०१७) :** (१) अशंत: खरे आहे. श्री.ए.टी.ए.के.शेख, चौकशी आयोगाने तपासणी केलेल्या प्रकरणांमध्ये प्र.क्र.६ येथे वाळूंज, ता.गंगापूर, जि.औरंगाबाद सर्व्हे नं.२११ मधील ३३ एकर ३५ गुंठे वक्फ जमीन लीजवर देण्यात आलेल्या प्रकरणाचा समावेश आहे. तथापि, सदर वक्फ मालमत्ता वक्फ अधिनियम,१९९५ मधील तरतुदीनुसार वक्फ मंडळाकडे पूर्ववत घेण्याबाबत न्या.ए.टी.ए.के.शेख, चौकशी आयोगाच्या अहवालामध्ये निर्देश देण्यात आलेले नाहीत.

(२) श्री.ए.टी.ए.के. शेख, चौकशी आयोगाने अहवालात नमूद केलेल्या प्रकरणांमध्ये तसेच त्याच्याशी समान असलेल्या अन्य प्रकरणांमध्ये बेकायदेशीरित्या विक्री, अदला-बदल इ. झालेल्या वक्फ मालमत्ता, वक्फ मंडळाकडे पूर्ववत करण्याच्या दृष्टीने वक्फ अधिनियमातील तरतुदीनुसार आवश्यक ती कार्यवाही करण्याच्या वक्फ मंडळाला सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच सदरच्या कामी महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळाला सहाय्य करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली १ उपजिल्हाधिकारी, २ तहसिलदार आणि २ नायब तहसिलदार यांचा समावेश असलेल्या एका कृती दलाची स्थापना करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. सद्य:स्थितीत या कृतिदलासाठी आवश्यक पदनिमिर्ती करण्यात आलेली असून, सदर पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासंदर्भात शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १७/१२/२०१६ मधील तरतुदीनुसार कार्यवाही सुरु आहे. शिवाय, सदरच्या मालमत्ता वक्फ मंडळाकडे पूर्ववत करण्याच्या दृष्टीने वक्फ अधिनियम, १९९५ मधील तरतुदींनुसार आवश्यक ती कार्यवाही तातडीने करण्याबाबत वक्फ अधिनियम, १९९५ च्या कलम ९७ अन्वये राज्य शासनास प्राप्त असलेल्या अधिकारांचा वापर करुन महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळाला दिनांक २१/०९/२०१७ च्या शासन निर्णय अन्वये निदेश देण्यात आलेले आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## औरंगाबाद येथील दर्गा दाऊद मगरीबी वक्फ मालमत्तेत गैरव्यवहार झाल्याबाबत

**(४४) ३३८७५ (११-०८-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक २७७१६ ला दिनांक १ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **अल्पसंख्यांक विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद येथील सीटीएस नंबर १२५०३ मधील दर्गाह दाऊद औलिया मगरीबी प्रकरणी भाडे पट्टा करार रद्द करुन सदरील मालमत्ता वक्फ मंडळाकडे पुर्ववत करण्याबाबतचा शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभागाने दिनांक ११ ऑगस्ट, २०१७ रोजी वा त्यासुमारास निर्गमित केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वरील शासन निर्णयाप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी वक्फ मंडळ यांनी भाडे पट्टा करार रद्द करुन सदरील मालमत्ता वक्फ मंडळाच्या ताब्यात घेतली आहे काय,

(३) असल्यास, असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन केलेल्या कार्यवाहीचे थोडक्यात स्वरुप काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२७-०९-२०१७) :** (१) अशंत: खरे आहे. श्री.ए.टी.ए.के. शेख, चौकशी आयोगाने तपासणी केलेल्या प्रकरणांमध्ये प्र.क्र.२ येथे औरंगाबाद येथील दर्गा दाऊद मगरीबी सि.टी.एस.नं.१२५०३ मधील ४४१८.३१ चौ.मी इतकी वक्फ जमीन लीजवर देण्यात आलेल्या प्रकरणाचा समावेश आहे. तथापि, सदर वक्फ मालमत्ता वक्फ अधिनियम, १९९५ मधील तरतुदीनुसार वक्फ मंडळाकडे पूर्ववत करून घेण्याबाबत न्या.ए.टी.ए.के.शेख, चौकशी आयोगाच्या अहवालामध्ये शिफारस करण्यात आलेली नाही.

(२) श्री.ए.टी.ए.के. शेख, चौकशी आयोगाने अहवालात नमूद केलेल्या प्रकरणांमध्ये तसेच त्याच्याशी समान असलेल्या अन्य प्रकरणांमध्ये बेकायदेशीरित्या विक्री, अदला-बदल इ. झालेल्या वक्फ मालमत्ता, वक्फ मंडळाकडे पूर्ववत करण्याच्यादृष्टीने वक्फ अधिनियमातील तरतुदीनुसार

आवश्यक ती कार्यवाही करण्याच्या वक्फ मंडळाला सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच सदरच्या कामी महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळाला सहाय्य करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली १ उपजिल्हाधिकारी, २ तहसिलदार आणि २ नायब तहसिलदार यांचा समावेश असलेल्या एका कृती दलाची स्थापना करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. सद्य:स्थितीत या कृतिदलासाठी आवश्यक पदनिमिर्ती करण्यात आलेली असून, सदर पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासंदर्भात शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १७/१२/२०१६ मधील तरतुदीनुसार कार्यवाही सुरु आहे.

तसेच दर्गाह दाऊद औलिया मगरिबी, औरंगाबाद या वक्फ संस्थेच्या मुतवल्लींना कायदेशीर प्रक्रिया राबवून मुतवल्ली पदावरुन हटवून सदर वक्फ मालमत्ता थेट वक्फ मंडळाच्या ताब्यात घेण्याच्यादृष्टीने आवश्यक ती कायदेशीर कार्यवाही करण्याबाबत वक्फ अधिनियम, १९९५ च्या कलम ९७ अन्वये प्राप्त असलेल्या अधिकाराचा वापर करुन दिनांक ११/०८/२०१७ च्या शासन निर्णयान्वये वक्फ मंडळाला निदेश देण्यात आले आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## इयत्ता ७ वी व ९ वी चा तसेच दहावी-बारावीच्या शिक्षण पध्दतीत व अभ्यास क्रमात बदल करण्याबाबत

**(४५) ३३९८७ (१८-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील, श्री.विक्रम काळे, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शैक्षणिक वर्ष २०१७-२०१८ पासून इयत्ता ७ वी व ९ वी चा अभ्यासक्रम बदलण्यात आला असून दहावी-बारावीच्या शिक्षण पध्दतीत व अभ्यास क्रमात बदल करण्याचा मानस शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर अभ्यासक्रम तयार करताना स्त्रीभृण हत्या या विषयावर धडा घेणे गरजेचे असल्याची मागणी सामाजिक संघटनाकडून करण्यात येत असून दहावी-बारावीच्या शिक्षण पध्दतीत व अभ्यासक्रमात बदल करण्यासाठी तज्ञांची समिती गठीत केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शैक्षणिक वर्ष २०१८-२०१९ पासून इयत्ता ८ वी व १० वी च्या अभ्यासक्रमात बदल करण्यात येणार असून या शिक्षणपध्दती व अभ्यासक्रम बदलाचे स्वरूप काय आहे,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन इयत्ता ७ वी व ९ वीच्या सुधारित अभ्यासक्रमात स्त्रीभृण हत्या या विषयावर धडा घेणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२८-०९-२०१७) :** (१) होय.
(२) नाही.
(३) होय. ज्ञानरचनावादी व कृती पुस्तिकेच्या स्वरुपात.
(४) नाही.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सार्वजनिक बांधकाम विभागात 'क्वान्टा प्लस' सॉफ्टवेअरची सक्ती करण्याबाबत

**(४६) ३३९९५ (०७-०८-२०१७). श्री.मितेश भांगडिया :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सार्वजनिक बांधकाम विभागात रस्त्यांच्या सर्वेक्षणासाठी 'क्वान्टा प्लस' सॉफ्टवेअर खरेदी करण्याचे आदेश देण्यात आल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर 'क्वान्टा प्लस' सॉफ्टवेअरची सार्वजनिक बांधकाम विभागातील रस्त्यांच्या सर्वेक्षणामध्ये आवश्यकता विभागाकडून तपासण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर 'क्वान्टा प्लस' सॉफ्टवेअर राज्यातील विशेषत: विदर्भात प्राथमिकतेच्या आधारे खरेदी करण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, राज्यात कोणकोणत्या जिल्ह्यामध्ये प्रशासकीय आदेशांतर्गत झालेल्या कोट्यवधी रुपयांच्या निधीतून खरेदी केलेल्या सॉफ्टवेअरचा सर्वसाधारण तपशील काय आहे ?

**श्री. चंद्रकांत पाटील (०३-१०-२०१७) :** (१) हे खरे नाही.

'क्वांटा प्लस' सॉफ़्टवेअरची खरेदी करण्याबाबत शासन स्तरावरून कोणत्याही प्रकारचे आदेश देण्यात आलेले नाहीत.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) अमरावती प्रादेशिक विभागांतर्गत, विहीत कार्यपध्दतीनुसार निविदा सूचना काढून क्वांटा प्लस सॉफ्टवेअरची खरेदीची कार्यवाही करण्यात आल्याचे क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी कळविले आहे.

(४) राज्यात क्वांटा प्लस सॉफ्टवेअर खरेदीबाबत कोणत्याही प्रकारचे प्रशासकीय आदेश शासन स्तरावरून निर्गमित करण्यात आलेले नाहीत.

---

**उस्मानाबाद जिल्हाधिकाऱ्यांनी बळीराजा चेतना अभियानांतर्गत शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी दिलेल्या विशेष निधीतून सुमारे २५ लाख रुपयांचे संगणक संच खरेदीबाबत**

**(४७) ३४१६४ (०७-०८-२०१७). डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जिल्हाधिकारी, उस्मानाबाद यांनी बळीराजा चेतना अभियानांतर्गत शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी दिलेल्या विशेष निधीतून रूपये २५ लाखांचे संगणक संच खरेदी जाहिरातीवर केले असल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने अनावश्यक खर्च करणाऱ्या दोषी अधिकाऱ्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१६-१०-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ च्या शासन निर्णयान्वये जिल्हास्तरावर कक्ष चालविण्यासाठी आस्थापना व कार्यालयीन खर्चाकरिता रू.२५ लक्ष पर्यंत खर्च अनुज्ञेय करण्यात आला आहे. त्यानुसार जिल्हाधिकारी कार्यालयाने

संगणक प्रोजेक्टर व प्रोजेक्टर स्क्रीन या बाबी खरेदी करण्यासाठी रू.२२,३४,२५७/- इतका खर्च केला आहे. जाहिरातींवर कोणताही खर्च करण्यात आलेला नाही.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**कोल्हापूर जिल्ह्यात शासकीय अभियांत्रिकी महाविद्‌यालय सुरु करण्याबाबत**

**(४८) ३४२८९ (१८-०८-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाने अभियांत्रिकी महाविद्‌यालयाबाबत नवीन सहा शासकीय अभियांत्रिकी महाविद्‌यालये उभारण्यासाठी प्रस्ताव तयार केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कोल्हापूर विद्‌यापीठाचा कोटा या शासकीय अभियांत्रिकी महाविद्‌यालयासाठी शिल्लक असून मागील अनेक वर्षे कोल्हापूरमध्ये शासकीय अभियांत्रिकी महाविद्‌यालय सुरु व्हावे अशी मागणी होत असून या नवीन प्रस्तावित सहा अभियांत्रिकी महाविद्‌यालयाच्या यादीत कोल्हापूर जिल्ह्याचे नाव नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२५-०९-२०१७) :** (१) राज्यातील निवडक अस्वायत्त शासकीय तंत्रनिकेतनांचे रुपांतर शासकीय अभियांत्रिकी महाविद्‌यालयात करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

(२) होय.

(३) शिवाजी विद्‌यापीठ, कोल्हापूर या विद्‌यापीठाच्या कार्यक्षेत्रात एक शासकीय व एक शासन अनुदानित अभियांत्रिकी महाविद्‌यालय कार्यरत आहे. तसेच सदर विद्‌यापीठात तंत्रज्ञान विभाग सुरु आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अकोला जिल्हयातील अकोट-हिवरखेड-तेल्हारा या राज्य मार्गाचे रुंदीकरण व मजबुतीकरण करणेबाबत

**(४९) ४५१०८ (१५-०१-२०१४). श्री.विक्रम काळे, डॉ. सुधीर तांबे : दिनांक २ ऑगस्ट, २०१३ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित यादी क्रमांक १२ मधील प्रश्न क्रमांक ३६६४७ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोट-हिवरखेड-तेल्हारा (जि.अकोला) या राज्य मार्गाचे लांबीत सुधारणा करण्याचे कामास तांत्रिक मंजुरीत मिळाली असुन सदर कामा पैकी ७२/०० ते ७७/५०० या लांबीच्या रस्त्याचे कामाचे निविदा स्तरावरचे काम पूर्ण झाले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यापैकी ७९/०० ते ८३/०० व ९५/०० ते ९६/०० या लांबीचे रस्त्याचे काम पूर्ण झाले आहे, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, आतापर्यंत प्राप्त झालेला निधी व कामाची सद्य:स्थिती काय,

(४) नसल्यास, होणाऱ्या विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकात पाटीत (०५-१०-२०१७) :** (१) व (२) हे खरे आहे.

(३) व (४) प्रश्नाधिन रस्त्याच्या कि.मी. ७२/०० ते कि.मी. ७७/५०० या लांबीतील डांबरीकरणाचे काम पूर्ण झालेले असून त्यासाठी रुपये १७४.०० लक्ष इतका निधी खर्च झालेला आहे.

तसेच, सदर रस्त्याच्या कि.मी. ७९/०० ते कि.मी.८३/००, किं.मी. ८७/०० ते कि.मी. ८९/०० व कि.मी. ९५/०० ते कि.मी. ९६/०० या लांबीतील रस्ता सुधारण्याचे काम पुर्ण झाले असून त्यासाठी रुपये १२९.०५ लक्ष खर्च झालेला आहे.

---

**राज्यातील प्रमुख शहरांमध्ये "एमएमआरडीए" च्या धर्तीवर स्वतंत्र विशेष प्राधिकरण स्थापन करण्याच्या प्रस्तावाबाबत**

**(५०) ४६९५३ (२०-०१-२०१४). डॉ. निलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील नागपूर, अमरावती, जळगांव, पुणे, नाशिक, औरंगाबाद, सोलापूर आदींसह राज्यातील काही प्रमुख्य शहरांमध्येही "एमएमआरडीए" च्या धर्तीवर स्वतंत्र विशेष प्राधिकरण स्थापण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या प्रस्तावावर शासनाने निर्णय घेतला आहे काय, त्याचे स्वरुप काय आहे व त्यानुषंगाने शासनाने पुढे कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) या प्रकरणी अद्याप निर्णय झाला नसल्यास, याबाबतची सद्य:स्थिती काय आहे ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१५-०९-२०१७) :** (१), (२) व (३) महाराष्ट्र महानगर नियोजन समिती (रचना व कामे)(तरतुदी पुढे चालू ठेवणे) अधिनियम, १९९९ याच्या कलम २ च्या खंड (क) अन्वये महानगर क्षेत्र म्हणून घोषित केलेल्या विवक्षित क्षेत्रांच्या उचित, व्यवस्थित व शीघ्र विकासाचे समन्वयन व पर्यवेक्षण करण्याच्या आणि अशा विकासाच्या योजना, प्रकल्प व परियोजना याची अंमलबजावणी करण्याच्या प्रयोजनार्थ अशा प्रदेशातील क्षेत्रांकरिता प्राधिकरण स्थापन करण्यासाठी आणि त्यांच्याशी संबंधित किंवा तदानुषंगिक बाबींसाठी तरतूद करण्याकरिता महारष्ट्र महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, २०१६ (२०१७ चा महा. ३) अधिनियमित केला आहे.

सदर अधिनियम अधिनियमीत करण्यापूर्वी प्रख्यापित केलेल्या महाराष्ट्र महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, २०१६ (सन २०१६ चा महा. अध्या. ११) खाली पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण स्थापन करण्यात आले आहे. राज्यातील नाशिक, औरंगाबाद व नागपूर महानगर

प्रदेशासाठी उक्त अधिनियमाखाली प्राधिकरणे स्थापन करण्यात आली आहेत. राज्यातील अमरावती, जळगांव व सोलापूर जिल्ह्यातील क्षेत्र महाराष्ट्र महानगर प्रदेश नियोजन समिती (रचना व कामे)(तरतुदी पुढे चालू ठेवणे) अधिनियम, १९९९ याच्या कलम २ च्या खंड (क) नुसारच्या महानगर प्रदेश क्षेत्र घोषित नसल्याने अशा शहरांकरिता उक्त अधिनियमाखाली महानगर प्रदेश विकास प्राधिकरण स्थापन करण्याचे तुर्त नियोजित नाही.

---

**विधान भवन :**
**नागपूर.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण : शासकीय मुद्रणालय, नागपूर.